**भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील मौजे सोनारवाडी-कोंडगाव, धनगरवस्ती-पांगारी व डेरे या पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांकरिता निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अर्थसं -२०२३/प्र.क्र. ०८/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २८ मार्च, २०२३

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र. ५५०/र-१, दि. ०१.०८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८.०३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि. १७/४/२०१५
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग दि. पुनर्व-२०२०/१७३/प्र.क्र ६३/र-८, दि. १९/०१/२०२१
५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे यांचे पत्र जा. क्र.जिप/ग्रापापू/वशि/५१३/२३, दि. ९/०१/२०२३

प्रस्तावना-

भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील मौजे सोनारवाडी-कोंडगाव, धनगरवस्ती-पांगारी व डेरे या पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संदर्भाधीन क्र. ५ येथील पत्रान्वये निधी मागणी प्रस्ताव कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे यांनी शासनास सादर केला आहे.

२. त्यानुसार प्रस्तावाधीन प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांकरिता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील मौजे सोनारवाडी-कोंडगाव, धनगरवस्ती-पांगारी व डेरे या पुनर्वसित गावठाणांमधील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी एकूण रूपये ४८,५४,९२६/- (रूपये अठ्ठेचाळीस लक्ष चौपन्न हजार नऊशे सव्वीस फक्त) एवढा निधी सन २०२२-२०२३ या चालु वित्तीय वर्षात वितरित करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील मौजे सोनारवाडी-कोंडगाव, धनगरवस्ती-पांगारी व डेरे या पुनर्वसित गावठाणांमधील खालील विवरणपत्रात नमूद प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये ४८,५४,९२६/- (रूपये अठ्ठेचाळीस लक्ष चौपन्न हजार नऊशे सव्वीस फक्त) “मागणी क्रमांक सी-१०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प(कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१ एच-७२७)” या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे-

**(रक्कम रूपयात)**

| अ. क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | प्रशासकीय मान्यता दिलेली रक्कम | यापूर्वी वितरित एकूण निधी | आता वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | सोनारवाडी-कोंडगाव | नळ पाणीपुरवठा योजना | २६,६७,४६०/- | निरंक | **२१,३३,९६८/-** |
| २ | धनगरवस्ती-पांगारी | नळ पाणीपुरवठा योजना | ९,५८,०६०/- | निरंक | **८,६२,२५४/-** |
| ३ | डेरे | नळ पाणीपुरवठा योजना | २८,५९,५४५/- | निरंक | **१८,५८,७०४/-** |
| | | | **एकूण-** | निरंक | **४८,५४,९२६/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी नागरी सुविधा व तद्नुषंगिक कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे

तसेच जिल्हाधिकारी, पुणे यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष "मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प(कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)" (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प(कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)" (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)" (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) या संदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२२-२०२३ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१२४७१९१११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2023.03.28 12:51:54 +05'30'

**( संजय जगताप )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक,पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
१०. वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय,मुंबई-३२.
११. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग,कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१३. महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय,मुंबई ३२.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

*****